**विभागीय स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन**
**समितीवर अशासकीय सदस्यांच्या नेमणुका**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्र.भ्रनिस-२००२/प्र.क्र.७/०२/११-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ५.३.२००३.

संदर्भ : शासन परिपत्रक क्र.भ्रनिस-२००२/प्र.क्र.७/०२/११-अ, दि.१०.१०.२००२.

**परिपत्रक**

शासन परिपत्रक क्र.भ्रनिस-२००२/प्र.क्र.७/०२/११-अ, दिनांक १०.१०.२००२ अन्वये विभागीय, जिल्हा व तालुका स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समित्यांवर अशासकीय सदस्यांची नेमणूकीची सुधारित कार्यपद्धती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्तांनी त्यांच्या विभागातील सर्व जिल्ह्यांच्या पालकमंत्र्यांकडून नावे मागवावीत. पालकमंत्र्यांकडून नावे प्राप्त झाल्यानंतर संबंधित व्यक्तीबाबतचे पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक यांचे अहवाल विचारात घेऊन नेमणूकीस पात्र अशा सदस्यांची नावे विभागीय आयुक्तांनी त्यांच्या शिफारशींसह मा.मुख्यमंत्री यांच्याकडे मान्यतेसाठी सादर करावीत. या नावांमधून १० नावांची निवड मा.मुख्यमंत्र्यांच्या मान्यतेने करण्यात आल्यानंतर अशासकीय सदस्यांच्या नेमणूकीचे आदेश विभागीय आयुक्तांनी निर्गमित करावेत, असे नमूद करण्यात आले आहे.

२. उपरोक्त शासन परिपत्रकानुसार विभागीय स्तरावरील भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर १० अशासकीय सदस्यांची नेमणूक करण्याबाबत सूचित करण्यात आले आहे. तथापि त्यांची गटनिहाय नियुक्ती कशा प्रकारे करण्यात यावी, याबाबतचे मार्गदर्शन करण्यात आले नव्हते. सबब, आता याबाबत असे सूचित करण्यात येते की, शासन परिपत्रक क्र.भ्रष्टानि-२००१/प्र.क्र.७/११-अ, दिनांक १६.६.२००१ अन्वये जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीसाठी विहित करण्यात आलेल्या गटानुसारच विभागीय भ्रष्टाचार निर्मूलन समितीसाठी देखील अशासकीय सदस्यांच्या नेमणूका करण्यात याव्यात. तसेच अशा नेमणूका करताना जिल्हा भ्रष्टाचार निर्मूलन समितीवर अशासकीय सदस्यांची नेमणूक करताना ज्याप्रमाणे प्रत्येकी एक सदस्य १) महिला २)अनुसुचित जाती / जमाती ३) विमुक्त व भटक्या जाती/जमाती ४) इतर मागासवर्गीय या प्रवर्गांमधून निवडल्या जातात त्याचप्रमाणे निवडणे आवश्यक राहील. मात्र कोणत्याही परिस्थितीत अशासकीय सदस्यांची एकूण संख्या १० पेक्षा अधिक रहाणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

३. तसेच यासंदर्भातील कार्यपद्धती मात्र दि.१०.१०.२००२ च्या परिपत्रकान्वये विहित केल्यानुसार राहील, याचीही दक्षता कृपया संबंधितांकडून घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( भि.रा.वाढवे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
शासनाचे मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग
मंत्रालयातील विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती.